**शहरातील विकास कामावरील गुंतवणुकीचा प्राधान्यक्रम ठरवून शहर पायाभूत सुविधा गुंतवणूक प्राथमिकता आराखडा तसेच पाणीपुरवठा व मलनि:स्सारण सुविधेतील तफावत दुर करण्याचा कृती आराखडा तयार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-संकिर्ण-२०२५/प्र.क्र.१५/नवि-१६ (ई-९३१९२७)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २३ एप्रिल, २०२५

**संदर्भ :-**

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- अमृत-२०२२/प्र.क्र.१४१/नवि-३३ दि. १४ जुलै, २०२२

२) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक:- नगरो २०२३/प्र.क्र.३८९/नवि-३३ दि.२२ फेब्रुवारी, २०२४.

३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- स्वमअ-२०२२/प्र.क्र.७३/नवि ३४ दि. १५ जुलै, २०२२

४) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक:- अशास १४०७/३६०/प्र.क्र.२१९/नवि-२० दि. ३१ ऑगस्ट, २००९.

५) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः अशासे-२०२३/प्र.क्र.८८/नवि-०४ दि. १५ मार्च, २०२४

६) नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः अशासे-२०२३/प्र.क्र.८८/नवि-०४ दि. १५ मार्च, २०२४

७) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- धोरण-२०१७/प्र.क्र.१७१/नवि-१६, दि. १७ नोव्हेंबर, २०१७ दि. ३० सप्टेंबर, २०२०

८) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- धोरण-२०१७/प्र.क्र.९६/नवि-१६, दि.१२ डिसेंबर,२०१७, दि. ३० सप्टेंबर, २०२० दि. २४ एप्रिल, २०२३.

९) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०१५/प्र.क्र. ९०/नवि-१६ दि. १० जून, २०१६.

१०) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०१२/प्र.क्र. २४/नवि-१६ दि. २७ जून, २०१२.

११) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०१२/प्र.क्र. २७/नवि-१६ दि. २७ जून, २०१२

**प्रस्तावना :-**

राज्यातील शहरांमध्ये पायाभूत सुविधा विकासाची कामे केंद्र योजना, राज्य योजना, जिल्हा योजना तसेच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्वनिधीतून हाती घेण्यात येतात. प्रत्येक शहरातील सध्या विकसित झालेल्या पायाभूत सुविधा व भविष्यात निर्माण करावयाच्या सुविधांची गरज वेगवेगळी आहे. यास्तव राज्याच्या अर्थसहाय्याने हाती घेण्यात येणाऱ्या विविध पायाभूत सुविधांचा प्राधान्यक्रम निश्चित करून शहरांमध्ये नियोजनबद्ध पद्धतीने पायाभूत सुविधा विकसित करणे व त्यात सुसुत्रता आणण्याकरिता मा.मुख्यमंत्री महोदयांच्या १०० दिवस नियोजन आराखड्यात शहरातील विकास कामावरील गुंतवणुकीचा प्राधान्यक्रम ठरवून शहर पायाभूत सुविधा गुंतवणूक प्राथमिकता आराखडा तयार करण्याचे सुनिश्चित करण्यात आले आहे.

या अनुषंगाने शासनाच्या निधीतून मंजूर करण्यात येत असलेल्या कामांच्या अनुषंगाने शहरातील विकास कामावरील गुंतवणुकीचा प्राधान्यक्रम ठरवून शहर पायाभूत सुविधा गुंतवणूक

प्राथमिकता आराखडा तसेच पाणीपुरवठा व मलनि:स्सारण सुविधेतील तफावत दुर करण्याचा कृती आराखडा तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील महानगरपालिका तसेच नगरपरिषद व नगरपंचायतींना विविध पायाभूत सुविधा विकसित करण्यासाठी केंद्र योजना, राज्य योजना, जिल्हा योजना तसेच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्वनिधीतून अनुज्ञेय असलेल्या कामांकरीता शहर पायाभूत सुविधा गुंतवणूक प्राथमिकता आराखडा व शहरातील विकास कामावरील गुंतवणुकीचा प्राधान्यक्रम पुढील प्रमाणे ५ गटामध्ये प्रस्तावित करण्यात येत आहे-

| अ.क्र. | विकास आराखड्यातील पायाभूत सुविधा |
|---|---|
| १ | पाणीपुरवठा योजना |
| २ | मलनि:स्सारण व अनुषंगिक कामे |
| ३ | घनकचरा व्यवस्थापनाचे भांडवली प्रकल्प/ सार्वजनिक शौचालय/स्वच्छतागृह इ. |
| ४ | रस्ते |
| ५ | प्रशासकीय इमारत, सौर ऊर्जा प्रकल्प, उद्यान/ हरित पट्टे, जलस्त्रोतांचे संवर्धन व पुनर्जीवन, क्रिडांगणे, पथदिवे, स्मशानभूमी, अग्नीशमन केंद्र, मनपा/नपा शाळा व दवाखाने भौतिक सुविधा, आठवडी बाजार, व्यापारी संकुल, बहुपयोगी सभागृह, नाट्यगृह, इ. विकास आराखडयातील इतर सार्वजनिक सोयी सुविधा विकसित करणे |

०२. नगर विकास विभागाच्या विविध योजनांमधून विविध पायाभूत विकास कामांसाठी निधी मंजूर केला जातो. त्याप्रमाणे मूळ शासन निर्णयान्वये अनुज्ञेय असलेली सर्व कामे त्या-त्या शासन निर्णयात अनुज्ञेय राहतील परंतु कामाचा प्राधान्य क्रम उपरोक्त प्रमाणे राहिल.

०३. पाणीपुरवठा व मलनि:स्सारण सुविधेतील तफावत दुर करण्याच्या कृती आराखड्याबाबत. :-

सद्यस्थितीत राज्यातील २१७ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये १३५ LPCD नुसार पाणीपुरवठा करण्यात येत आहे. उर्वरित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये १३५ LPCD नुसार पाणीपुरवठा करण्यासाठी केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियान, नगरोत्थान महाभियान व इतर देय योजनांमधून पुढील पाच वर्षांमध्ये सदर क्षमता निर्माण करण्यात येईल. तसेच सद्यस्थितीत राज्यातील १०२ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये मलनि:स्सारण प्रकल्प कार्यान्वित आहेत. उर्वरित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये केंद्र पुरस्कृत अमृत २.० अभियान, नगरोत्थान महाभियान, जागतिक बँकेच्या प्रस्तावित महाराष्ट्र नागरी पाणीपुरवठा पुनर्वापर कार्यक्रम (MUWREP) व इतर देय योजनांमधून पुढील पाच वर्षांमध्ये मलजल प्रक्रियेची क्षमता निर्माण करण्याचे विचाराधीन आहे.

०४. गुंतवणूक प्राथमिकता आराखडा व शहरातील विकास कामावरील गुंतवणुकीचा प्राधान्यक्रमाच्या अनुषंगाने नगर विकास विभागाच्या निधीतून हाती घेण्यात येत असलेल्या प्रकल्पांसाठी पुढीलप्रमाणे सर्वसाधारण मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत आहेत-

i. केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत हाती घेण्यात येणारे प्रकल्प हे केंद्र पुरस्कृत योजनांच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणेच घेण्यात येतील.

ii. प्रथम पाणीपुरवठा योजनांस मंजूरी देण्यात येईल.

iii. पाणीपुरवठा योजना पूर्ण होऊन कार्यन्वित झाल्यानंतर मलनि:स्सारण प्रकल्प व अनुषंगिक कामे मंजूर करण्यात येतील.

iv. पाणी पुरवठा तसेच मलनि:स्सारण प्रकल्प व अनुषंगिक कामे प्रत्यक्ष कार्यन्वयित होऊन १० वर्ष झाल्यानंतर ड वर्ग महानगरपालिका व सर्व नगरपरिषद व नगरपंचायत सदर प्रकल्पाच्या विस्तारीकरणाकरीता नगरोत्थान महाभियानाच्या धर्तीवर प्रकल्पाधारित स्वरूपात महानगरपालिका क्षेत्रात मुलभूत सोई सुविधांचा विकास व वैशिष्टयपूर्ण योजनेतून अनुज्ञेय असतील.

v. घनकचरा व्यवस्थापनाकरीता स्वच्छ भारत मिशन अंतर्गत मंजूर असलेल्या प्रकल्पा व्यतिरिक्त अधिकची भांडवली गुंतवणुक (प्रकल्पातील मत्ता निर्मिती होणारी कामे) महानगरपालिका क्षेत्रात मुलभूत सोई सुविधांचा विकास व वैशिष्टयपूर्ण योजनेतून अनुज्ञेय असतील.

vi. पाणी पुरवठा तसेच मलनि:स्सारण प्रकल्प व अनुषंगिक कामे पूर्ण झालेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना रस्ते प्रकल्प अनुज्ञेय असतील.

vii. शहरांना सदर प्राधान्य क्रमानुसारच कामे मंजूर केली जातील आणि गुंतवणूक प्राथमिकता आराखड्यातील प्राधान्यक्रमातील पायाभूत सुविधा शहराच्या एकूण आवश्यकतेच्या ७५ टक्के उपलब्ध असल्याचे जिल्हाधिकारी यांनी प्रमाणित केल्यानंतर प्राधान्यक्रमातील पुढील काम नगर विकास विभागाच्या विविध योजनेंतर्गत तसेच स्वनिधीतून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अनुज्ञेय असेल.

viii. प्राधान्य क्रमातील पहिल्या ४ गटातील कामे पूर्ण झाल्यानंतर ५ व्या गटातील कोणतेही काम स्थानिक आवश्यकतेनुसार हाती घेता येईल.

ix. अपवादात्मक परिस्थितीत प्राधान्यक्रम शिथील करून स्थानिक पातळीवरील सार्वजनिक निकड विचारात घेऊन प्राधान्यक्रमातील पुढील काम घेणे आवश्यक असल्याचा प्रस्ताव जिल्हाधिकारी यांनी दिल्यास त्याबाबतचा अंतिम निर्णय शासन स्तरावरुन घेण्यात येईल.

x. प्राधान्यक्रमात नमूद कामे ज्या योजनेत अनुज्ञेय आहेत त्या योजनेतूनच प्राधान्यक्रमानुसार हाती घेण्यात यावीत.

०५. उपरोक्त प्राधान्यक्रम व मार्गदर्शक सुचाना विचारात घेऊन सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्याचे शहर पायाभूत सुविधा गुंतवणूक प्राथमिकता आराखडा तसेच पाणीपुरवठा व मलनि:स्सारण सुविधेतील तफावत दुर करण्याचा कृती आराखडा तातडीने तयार करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४२३१८३२२५१०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2025.04.23 18:33:35 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुद्धे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,बेलापूर भवन ७ वा मजला, नवी मुंबई - ४०० ६१४.
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई - ४०० ६१४
१५. जिल्हा प्रशासन अधिकारी (सर्व)
१६. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद/ नगरपंचायती
१७. वित्त विभाग, व्यय-३/कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.